# मी महाकवी दुःखाचा....

कवी ग्रेस

१० मे १९३७ – २६ मार्च २०१२



विनम्र आदरांजली !

**दीर्घ आजारासारखे**

**सारे आयुष्य चालले .....**

**कुणी भेटाया न आले**

**नाही निरोपाची फुले.....**

# कवी ग्रेस

१० मे १९३७- २६ मार्च २०१२

**नाव** - माणिक सीताराम गोडघाटे

**टोपणनाव** - ग्रेस

**जन्म** - १० मे, इ.स. १९३७ नागपूर

**कार्यक्षेत्र** - साहित्य, मराठीचे अध्यापन, विश्वकोश संपादक मंडळात समावेश.

**राष्ट्रीयत्व** - भारतीय

**भाषा** - मराठी

**साहित्यप्रकार** - कविता, ललितलेखन

**प्रसिद्ध साहित्यकृती** - संध्याकाळच्या कविता, चर्चबेल.

**प्रभाव** - अभिजात उर्दू परंपरा, रोमांचवादी इंग्रजी काव्य.

## पुरस्कार

१. संध्याकाळच्या कविता या संग्रहास महाराष्ट्र शासनाचे कवी केशवसुत पारितोषिक, १९६८

२. कविवर्य केशवसुत स्मृती काव्य पुरस्कार, २०१०

३. [साहित्य अकादमी पुरस्कार], इ.स. २०११ - 'वाऱ्याने हलते रान' या ललित लेखसंग्रहासाठी **वडील** सीताराम **आई** सुमित्रा **अपत्ये** मिथिला, माधवी आणि राघव परमेश्वरी कृपा या अर्थाने "ग्रेस" हे

साहित्यिक नाव धारण केले. *संध्याकाळच्या कविता* या इ.स. १९६७ साली प्रकाशित झालेल्या काव्यसंग्रहामुळे ते चर्चेत आले. अगदी अर्पणपत्रिकेपासून ते स्वतःच्या हस्ताक्षरामध्ये काही ओळी देण्याची पद्धत, अशा खास गोष्टी त्यांनी त्या पुस्तकाद्वारे आणल्या आणि ती परंपरा पुढेही चालू ठेवली. त्यांचे पाच काव्यसंग्रह आणि पाच ललितलेखसंग्रह प्रकाशित झाले आहेत.

"समजण्यास अत्यंत अवघड" इथपासून ते "केवळ शब्द-अभियांत्रिकी, अर्थच नाही" इथपर्यंतच्या टीका गोडघाट्यांच्या काव्यावरती झाल्या आहेत. यावर "मी माझ्या कवितेचा प्रियकर किंवा पाठीराखा नाही" असे त्यांचे म्हणणे होते

## प्रकाशित साहित्य

| नाव | साहित्यप्रकार | प्रकाशन | प्रकाशन वर्ष (इ.स.) |
|---|---|---|---|
| संध्याकाळच्या कविता | कवितासंग्रह | पॉप्युलर प्रकाशन | १९६७ |
| राजपुत्र आणि डार्लिंग | कवितासंग्रह | अमेय प्रकाशन,पॉप्युलर प्रकाशन | १९७४ |
| चर्चबेल | ललित लेखसंग्रह | पॉप्युलर प्रकाशन | १९७४ |
| चंद्रमाधवीचे प्रदेश | कवितासंग्रह | पॉप्युलर प्रकाशन | १९७७ |
| मितवा | ललित लेखसंग्रह | पॉप्युलर प्रकाशन | १९८७ |
| सांध्यपर्वातील वैष्णवी | कवितासंग्रह | पॉप्युलर प्रकाशन | १९९५ |
| संध्यामग्न पुरुषाची लक्षणे | ललित लेखसंग्रह | पॉप्युलर प्रकाशन | २००० |
| मृगजळाचे बांधकाम | ललित लेखसंग्रह | पॉप्युलर प्रकाशन | २००३ |
| सांजभयाच्या साजणी | कवितासंग्रह | पॉप्युलर प्रकाशन | २००६ |
| वाऱ्याने हलते रान | ललित लेखसंग्रह | पॉप्युलर प्रकाशन | २००८ |
| कावळे उडाले स्वामी | ललित लेखसंग्रह | पॉप्युलर प्रकाशन | २०१० |



'मी कविता करतो.
सुबोध की दुर्बोध ते ठाऊक नाही;
पण....
एक ठाऊक आहे.
तुम्ही जगता, ते मी लिहितो....
तुम्ही बोलता ती भाषा मी वापरतो...'

## ग्रेस यांच्या काही पुस्तकांच्या अर्पणपत्रिका

# सांध्यपर्वातली वैष्णवी

आत्म्याच्या नितळ काचेवर
पडलेले त्या नदीचे
संध्याकालीन प्रतिबिंब
नंतर हलत राहिले
हलतच राहिले..

नात्यागोत्याची नसलेली
चार परकी माणसे
वाळूवर मी आणि तुझा पिंड
हैराण झालो, चौघेही
फ़क्त एक खार ईकडुन
तिकडे निघुन गेली
नदीवर डोळे ठेवून
मी तिची करूणा भाकु लागलो..

माते धाड त्याला..! धाड त्याला. .
झाडीमागुन तो आला आणि
तुझा पिंड स्पर्शुन गेला
तुझ्या या सरीतापर्वात
आठवतेय ती नदी
आणि कृतज्ञतेने
भारावुन गेलेल माझे
लहानसे शरीर.

त्या नदीला नाही तुलाही नाही
संध्यापर्वातली वैष्णवी
अर्पण करायची
त्या कावळ्याला. . . .
मी अर्पण करतोय त्याला. . .



## मृगजळाचे बांधकाम

संध्यामायेच्या शुभमकरोती ओंजळीतून सांडताना
तू अचानक, अवाक होऊन,
दरदरून थरथरलीस... मला प्रयाणाची दिशा दाखवीत...
तू थांबली असतीस तर या मृगजळात
एखादा रंगीत मासा तरंगू शकला असता...
तिरीप एकदा बुबुळात शिरली की मग ती
अश्रूंच्या आदेशाने (ही) पापण्यातून खाली
सांडतच नाही; या सबब, शरमेवर तू नाही
थांबलीस!
पण मला तर हे बांधकाम, तुझ्याच निर्मितिसत्त्वाचे
शील म्हणून करणे भाग पडलेय ना?
तेव्हा हे मृगजळाचे बांधकाम, मी तुलाच
अर्पण करतोय.
अर्पण, तर्पण, समर्पण आणि दर्पण (ही)
यांचे, या सर्वांचे काही वेगळे अर्थ, अनर्थ
असतात काय? संभवतात का..य?

## मितवा

प्रतिबिंबांचे तारण देऊन
मी आरसा नाही मागत;
असे म्हणताच जुने बळ घेऊन
तू नव्याने दचकलीस
मागधी!
भातुकलीच्या भयकंपात
स्त्रग्धरा, शिराणी या नावांखाली
प्रश्नांकित झालीस;
तरी (ही) हे आत्मवैराण अवतरण
मी तुला देत नाहिये;
मितवा मी अर्पण करतोय;
अंगणात दाणे टाकण्यापूर्वीच
उडून गेलेल्या
चिमण्यांना.

अंगणात गमले मजला, संपले बालपण माझे
खिडकीवर धुरकट तेव्हा, कंदील एकटा होता



नेटाक्षरीकडून ह्या

महाकवीस

हे शेवटचे

“अर्घ्य”



# संध्येपारचा जोगी

तो संध्येपारचा जोगी
दिसतोच तळ्याच्या जागी

नभ त्याच्या पंखाखाली
पंखात केशरी शाली

ती भगवी मखमल माया
स्पर्शात झुलविते काया

नजरेत उतरते आग
ओलासा घेउन राग

संध्याही शोधे तिजला
संध्येने जोगी भिजला

ती ओली व्याकुळ राख
मुठीतुनी उमटे हाक

हातात कोवळे पाणी
हे अर्घ्य कुणाची देणी?

ती राख तळ्याला देता
देहाची फुलते कविता

कवितेत तयाची आई
संध्येस कळाले नाही

सचिन काकडे - मुंबई



## अखेरची चर्चबेल

संध्यामग्न पुरुषाची ओल्या वेळूची बासरी
रान वार्‌याने हलते, तिथे गुंगते वैखरी

चंदर्‌माधवीच्या देशी संध्याकाळच्या कविता
सांजभयाच्या साजणी, तुझा देवचाफा रिता

सांध्यपर्वत वैष्णवी मृगजळाला बांधून
राई निष्पर्ण तरूंची माया भगवी सांधून

घर थकले संन्यासी, गवाक्षात नादनक्षी
कुठे अनाम धुळीत दडे हतबल पक्षी

हिर्‌यातल्या कट्यारीनी केला नक्षतर्ांचा चुरा
मोक्ष चरणगतीचा राही पर्‌वास अधुरा

स्वामी कावळे उडाले, शब्दपालखी चालली
मितवा रे, अखेरची चर्चबेल निनादली

*क्रांति सडेकर - पुणे*

## 'एक' तुझाही 'वाटा'

पर्‌त्येकाचे 'मर्म' ओळखुन
त्याच्या 'वाटेपाशी'
'एक' तुझाही 'वाटा'

'संध्याकाळच्या  कविते'तला तू
'राजपुतर्‌ आणि डार्लिंग' मधला तू
'संध्यापर्वाची वैष्णवी' असो
वा 'सांजभयाची साजणी'
हा 'चंदर्‌माधवी पर्‌देशा'तील साठा
'एक' तुझाही 'वाटा'

तुझी 'चर्चबेल' आजही वाजते
जिथे तिथे भेटतो 'मितवा'
हे 'मृगजळाचे बांधकाम',
की,  'वा -याचे हलते रान'?
या सोप्या पण अवघड अवघड लाटा
'एक' तुझाही 'वाटा'

आता 'मज तुझी आठवण येते'
'घन व्याकूळ मीही रडतो'
म्हणूनच मनाचे 'घर थकलेले संन्यासी'
ही 'निष्पर्ण तरूंची राई'
हा हुंदक्यांचा बोभाटा
'एक' तुझाही 'वाटा'
'एक' तुझाही 'वाटा'

पीयूष नाशिककर - नाशिक



काडेपेटीतुन अलगद काढुन शिलगवावी
तशी संध्या पेटवायचास तु
आणि
सकाळ सवयीने आंथरुन गुंडाळावं तसं
घड्या घालुन ठेवायचासही...

चिमटीत धरुन भुरुभुरु ओढावा
तसा ओढायचा रांगोळीगत वळिवाचा पाऊस
आणि
ओंजळ रोपटी पेरुन जमीनीतुन उंचावतात
तसं पीक घ्यायचा ओल्या वेळु बास-यांचं

मोराबगळ्यांच्या सुरावट रमल्या ह्या जगात
तु कावळ्यांची ठोकताळे मांडलेस
आणि
अर्घ्यदानालासुध्दा अर्घ्यपात्रातुन
तु घनभारी अंधार ओतलास

ह्याचे पुरावे चर्चबेलमध्ये रमलेल्या
मागधीच्या प्रदेशात मिळतीलही
पण...

**आभाळापलीकडच आभाळ सांगणारी दुर्बीण**

एक मॅगेलान दुर्बिण आमच्याकडुन हरवल्याने
आमची गत आता
हलत्या रानात सांजभयाच्या साजणीपेक्षाही
जास्त भयभक्त झालीय त्याचं काय ?

*the most powerful telescope.......*

प्राजक्त देशमुख



# ग्रेस....मंतरणारा

तुझे शब्द आभाळाच्या काजळखोलीतून
मंतरणाऱ्या श्वासाची वाट काढत
पुढे आले ...
आज आभाळ सुनं सुनं,
संध्येचा प्रहर सुना सुना,

माणसाच्या आदिम दुःखाला
कल्पनेच्या तीरावर,
संगीताचे मुलभूत पंख
आता कोण देईल...????

करुणातूर झाडांना
सळसळत्या पानांचे दान
कोण देईल....??

कोण म्हणेल आता प्रार्थना
जळणाऱ्या क्षितीजासाठी;
कोण आईच्या उदरात जावून
शोधील तिचं सुख - दुःख...??

कुणाला शक्य आहे आता
गाईच्या हंबराला शब्दात बांधनं...?

आता गहिवर उरतील शब्दांचे फक्त
आणि आकांत तुझी आठवण काढत
वाऱ्यावर झुलणाऱ्या रानात
संध्याकाळी बुडून जातील.

तू काळाला खुडून घेतलंस...
आणि आत्ममग्न झालास
आज कायमचा ...

आता तुझ्या शब्दांच्या वाटेने
अर्थांचा सोहळा शोधत
आम्ही किती संधिकाल
सजवत रहायचे मनात....?

गजानन मुळे - सोलापूर

## ग्रेस व सौंदर्य सत्ता :

ग्रेस जे हे मृगजळांचे बांधकाम करीत आहेत. हे आपण सहृदयतेने समजून घेतले पाहिजे. कुठल्याही लौकीक तत्त्वग्यानाचा पुरस्कार न करता आपली पायवाट ते शोधत आहेत. मृगजलाचे बांधकाम हे ग्रेसच्या दृष्टीकोणातून कलावंताच्या मनोनिर्मित भावसत्याची पुनर्निमिती आहे व निर्मिती कालातीत असते. तसेच ह्या बांधकामाच्या पायाचे दगड, तरलता व तडफड ही आहेत. ह्या तरलता व तडफडीचा एकत्मभाव साधतांना तोल सावरला जातो, त्यातच सौंदर्य योग आहे ,असे ग्रेस ना वाटते.

मुळात ग्रेस मृगजळाचे बांधकामाची बीज केवळ उसवून दाखवत नाहीत तर एका स्वतंत्र सौंदर्यसत्तेची अस्तित्वता अट्टाहासाने वारंवार सिद्धकरण्याचा प्रयत्नी करतात. किंबहुना ग्रेस मानवी जिवन व त्याचा भोवताल याची विभागणी तिन सत्तेत करतात. एक निसर्गसत्ता दुसरी जिवन सत्ता व तिसरी सौंदर्यसत्ता.

निसर्गसत्ता हे चिरंतन सत्ता असून निसर्ग(Physical Nature) अस्तित्वात आहे. मानव ही त्याच निसर्गाचा एक घटक आहे. भौतिक निसर्ग ( किंवा विश्व म्हणू या ) याच्या निर्मितीची कारणे जरी गुलदस्त्यात असली व मानवाला माहीत नसली तरी मानव सापेक्ष निसर्गाचे अस्तित्व मान्य करणे मानवाला भाग आहे. निसर्ग ॠत स्वरुपात असल्यामुळे त्याचे स्वःताचे नियम आहेत व त्याची काटेकोपणे अंमलबजावणी तो करीत असतो. भौतिक अर्थाने हा निसर्ग ॠत असल्यामुळेच सत्य आहे आणि त्याला काळाचे परिमाण लाभले आहे हे विसरुन चालणार नाही.

थेरी आफ रिलेटिव्हीरीतन जाता एवढे निश्चित की निसर्ग हा पुर्णतः स्वतंत्र पृथगात्म, सनातन व स्वसंवेद्य असल्यामुळे त्याची एक सत्ता (Authority or Soverign Power) अस्तित्वात आहे. ही सत्ता त्याच्या सर्व घटकावर म्हणजे हवा, पाणी, जमीन, झाडे, पशू, पक्षी, तारे, नक्षत्रे यावर चालते. मनुष्य ही ह्या सत्तेचा घटक असल्यामुळे भौतिकरुपात त्या मर्यादेत तिचा अमंल मानवावर ही आहे. व्यापक अर्थाने असे म्हणता येईल की निसर्ग हे आधी भौतिक सत्तेचे निधान आहे. दुसरी सत्ता ही जीवन सत्ता आहे. उघडपणे ती मानवी जीवनाशी सबंधित आहे. मानवी सत्ता ही पुढे तिन विभागात कल्पिता येऊ शकते. मानवाचा जीवनार्थ जो कलह चाललेला आहे व त्याचे नियमन करणारी जी सत्ता आहे ती जीवनसत्ता. मानवाचा संघर्ष व संवाद हा तिन पातळीवर चालू असतो. मानवाचा निसर्गाशी संघर्षही आहे व संवादही. हा संघर्ष हजारो वर्षापासुन चालू आहे. 'जीवनार्थ कलह' या न्यायाने त्याचा निसर्गाशी कलहही चालू असून निसर्ग घटकांची मानवी जीवनातील उपयुक्तता ध्यानात घेऊन त्या घटकाबरोबर सहकार्य व संवादही मानव प्रस्तापित करीत आहे. पर्यावरण संवर्धन हा त्याच कडीचा एक भाग आहे. मानवाचा भौतिक विकास हा निसर्गसत्तेशी केलेल्या संघर्षाचा परिपाक म्हटल्यास वावगे ठरु नये.मानवाचा दुसरा संघर्ष हा त्याचा आपाआपसातील आहे. मानव मानवाशी संघर्ष करतो व त्याच्या पातळ्या अनेक आहेत. याचे नियमन करण्यासाठीच मानवाने वेगवेगळ्या संस्था निर्माण केल्या आहेत. वेगवेळ्या राजकिय, सामाजिक, आर्थिक व धार्मीक संघटना हेच नियमन करण्याचा प्रयत्न करतात. मानवाचा तिसरा संघर्ष हा स्वतःशीस आहे. आपल्या इच्छा, आकांक्षा, गुण, दोष, न्युनगंड, यांच्याशी त्याचा अखंड संघर्ष व

ग्रेस

संवाद चालू आहे. मुख्यतः सामान्य माणसाच्या मनोरचना व्यापाराशी याचा संबंध येतो. याचे नियमन व व्यवस्थापनासाठी त्याने अनेक संस्था उभारल्या आहेत. शिक्षण संस्था, संस्कार केंद्र, मानसोपचार केंद्रे, गुरु, धार्मिक उपदेश करणाऱ्या संघटीत व असंघटीत संस्था ही त्याचेच रुपे होत. ह्या ही संस्था स्वतंत्र असुन त्याची मानवावर एक सत्ता आहेच. मानवी भावना व विचार यांच्या भौतिक बाजूंनी विचार करुन त्याचे व्यवस्थापन करणाऱ्यानचा प्रयत्न यातून दिसून येतो. उघडपणे माणसावर ह्या सर्व संस्थेचा पगडा प्रबळ आहे. तिसरी सत्ता ही सौंदर्य सत्ता आहे असे ग्रेस मानतात. ही सता पुर्वी पासुनच अस्तित्त्वात होती ,आहे व राहीन . मध्ययुगीन काळात जेंव्हा राजा सार्वभौम होता व धार्मिक कायदा बलवान होता त्याकाळी ही मायकेल एंजलो, लिओनार्दो विन्सी पासून ते शेक्सपियर पर्यंतच्या प्रतिभावंतांनी व आपल्याकडे ज्ञानेश्वरापासून ते रामदासापर्यंतच्या प्रतिभावंतांनी स्वतंत्र सौदर्यसत्तेची व्दाही फिरवली होती हे विसरुन चालणार नाही. प्रबोधनाचे युग हे याची साक्ष आहे. जुलमी राज्यसत्ता, कट्टर धर्मसत्ता व अनास्था असलेला मोठा जनसमुदय असतांना काही प्रतिभावंतांनी सौंदर्यसत्तेची पताका फडकवत ठेवलेली आहे हे जगाच्या इतिहासात वारंवार द्गोचर होते. विलक्षण प्रतिभा असलेली माणसे प्रचलित तत्त्वज्ञान व नियमांचेबंधन झुगारुन आत्मक्लेश भोगुन व प्रसंगी मोठ्यातला मोठा त्याग करुन आपल्या अंतरात्म्याच्या हाकेला साद देतात तेंव्हा सौंदर्यसत्तेच्या अस्तित्त्वावरची राख बाजूला होऊन या सत्तेची ज्वाला नव्याने प्रज्वलित होते म्हणूनच अल्बेर कामुला 'बंडखोरीचे तत्त्वज्ञान' निर्माण करावेसे वाटले. साहित्य व कलेतील वेगवेगळे वाद जसे अभिजात वाद, अद्भूतरम्यवाद वास्तववाद, मार्क्सवाद, अतिवास्तववाद, अस्तित्त्ववादा या वादाचे उद्‌बोधनच मुळी सौंदर्यसत्तेची वेगळी चूल मांडतात. शुद्धण कलेच्या प्रांतातित रुपवाद, प्रतिमावाद, प्रतीकवाद लौकिकतावाद, कलावाद, अविष्कारवाद, अद्‌भु तरम्यवाद ही तर सौंदर्यसत्तेच्या विकासातील महत्त्वाचे टप्पे आहेत हे कसे विसरुन चालेल.

पारंपारिक सौंदर्य सत्तावादाला तत्त्वज्ञानाचे वावडे नव्हते त्यामुळे जीवनसत्तेतील काही अंतर्भाव सौंदर्यसत्ते ही येत असे. सौंदर्या बरोबर प्रग्येलाही महत्त्व मानणारा फार मोठा कलाकारांचा व प्रतिभावंतांचा गट असल्यामुळे असे झाले असावे. तथापि ग्रेस यांना अभिप्रेत असलेली सौंदर्य सत्ताही जास्त परिष्कृत(refined) एकांतिक व उतात्तवादी(Sublimed) वाटते. ग्रेस जीवनसत्ता व निसर्गसत्तेतील अनुषंगिक वाद सौंदर्यसत्तेत आणू ईच्छित नाही. शुद्ध निखळ कलावादाकडे झूकणारी ही भुमिका असली तरी आध्यात्मिक जाणीवांचे वावडे ग्रेसच्या सौंदर्यसत्तेला नाही हे फार मोठे वैशिष्ठ मानावे लागेल. कारण मुळात 'अध्यात्' व प्रतिभावंताची 'व्योम वेदन'' अशी विभागणी करण्याची ग्रेस यांना आवश्यकता वाटत नाही. त्यामुळेच वेदना, चिरंतन दुःख इतकाच करूणेचा कृतार्थ स्पर्शीही त्यांच्या सौंदर्य सत्तेच्या परिघात येतो. निरपेक्ष त्याग, आत्यंतिक करूणा, एकरूप होण्याची तगमग व तडफड ही आध्यात्मिक जाणीवांची प्रसाद चिन्हे ही ग्रेस गौरवाने मांडताना दिसतात. प्रथमच शुद्ध कलावाद हा अध्यात्म्याच्या धुक्यात आपली नवी वाट शोधताना दिसतो अन यामुळेच एका बाजुला मायकेल एंजेलो, शेक्सपिअर, व्हन गाग, एमिलीब्रांटे, बादलियर इ्वाईग, रिल्के येतात तर दुसऱ्या बाजूने ज्ञानेश्वर, टालस्टय, तुकाराम, महानुभाव पंथी व रामदास ग्रेसच्या संवेदना विश्वाचा एक भाग बनून जातात. कदचित ह्यामुळेच

सौंदर्यसत्तेतील निर्मिती प्रक्रिये बद्दशल ते अती हळूवार व संवेदशिल झालेले आहेत. किंबहुना आपलीच निर्मिती प्रसंगी मृगजळ, प्रसंगी भासाचे प्रतिक तर कधी सत्याभासाची प्रतिमा त्यांना वाटत असावी. कलाकार जर अंत प्रेरणेने मनोनिर्मित भावसत्याची पुननिर्मिती करत असेल तर ते एक स्वतंत्र विश्व आहे व त्याचे नियमन स्वतंत्र सत्तेव्दारेच केले जावे ही त्याची रास्त अपेक्षा आहे. म्हणूनच ते एक स्वतंत्र परिष्कृत सौंदर्यसत्तेच्या(Sublimised Aesthetic Power) संकल्पनेचे उद्‌बो◌ूधन करतात. तसेच या सौंदर्यसत्तेला अतिव्याप्तीचे क्षितीज नाकारुन त्याचा पाया तरलता व तडफड या मानवी सनातन वेदनेवर उभे करू पाहतात. सौंदर्यसत्तेत काय नाही? सर्वच तर आहे. त्यात आहे, तरलता, तडफड, आर्तता, वेदनेची शिराणी, ब्रह्मांडाला मिटवू शकणारा व भास सत्याव्दारे पुनर्निमिती करु शकणारा एकांत अनवटलयीचे हुंकार, सत्याचे भास आणि भासमान सत्ये, कौर्य व करुणा, निर्मोही उदात्तता अन विश्वनिर्मितीच्या प्रसुती वेदना; एवढया शिदोरीवर का बरे एक नवीन सत्तेची कल्पना करता येणार नाही?

ग्रेस यांना परिष्कृत सौंदर्यसत्तेच्या निर्मितीत मग वेगवेगळ्या माध्यमाच्या मर्यादा लक्षात येतात. लेखन कलेतील भाषेच्या मर्यादा त्यांना फारच जाणवतात व यामुळेच भाषेला संवेदना लयीचा ताल तोलावयास ते भाग पाडतात. त्यांची भाषा अर्थवहनाची पखाल न होता संवेदनाची पालखी होते.विचाराने मानवाचे विश्व भ्रष्ट केले असल्यामुळे विचार देणे हे कलेचे साध्य होऊ शकत नाही. कलेचे एकच उद्दि ष्ट आहे ते म्हणजे मानवाच्या सर्व संवेदनाना आवाहन करणे, हाक देणे. त्यातुन भावसत्याची निर्मिती हा अनुषंगिक भाग झाला. ग्रेस जर करू शकले असते तर त्यांनी भाव व विभावानाही मुठ्माती दिली असती. तथापि निर्मिती मग ही कुठल्याही प्रकारची असो तिला एक रुप येते व रूपातून भावसत्य जोपासले जाते. हे ग्रेस ओळखतात. भावसत्याच्या निर्मिती नंतर रूपामुळे आलेल्या मर्यादा त्यांना खटकतात. त्यांचा जीव कासाविस होतो अन पुन्हा ते आदिम संवेदनाकडे वळतात. ग्रेसचा परिष्दृत सौंदर्य सत्तावाद(Refined Aestheticism) हा शुद्धितावादाच्या(Puritism) क्षितीजावर मग हिंदकळत राहतो याची जाणीव मनाला चाटून जाते. हा कवी वारंवार आदिम प्रेरणाना का आवाहन करतो याचे आश्चर्य वाटत नाही. एकाच वेळी कौर्य व करूणा याला ते आवाहन करतात कारण त्या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. एकीच्या अभिव्यक्तीत दुसरीच्या अस्तित्त्वाचे अभिधान साठविले आहे. ग्रेस सारखा प्रतिभावंत काळ पुरूषाच्या ललाटावर नविन लेख लिहित नाही. तर पुसलेल्या ओळीचा मागोवा घेण्याचा निडर प्रयत्न करत असतो. काळ पुरुषाच्या ललाटावर अक्षरे खोदण्याचे स्वातंत्र्य सुदैवाने विश्वनियंत्याने कोणालाही दिलेले नसते व प्रतिभावंताला तसे वाटले तरी ही त्यावेळी त्याला त्याच्या क्षणभंगुरतेची जाणीव असते व त्यामुळेच तो कौर्य व करुणेच्या हिंदकळ्यात सापडून स्वतःच भयकंपित करु लागतो.म्हणुनच ग्रेस उदास होतात आणि म्हणू लागतात " भय इथले संपत नाही".

सुधाकर कुलकर्णी - नासिक

गर्द रानातून एकटाच तो चालत होता..हिरव्याकंच पानांचा अंगाला होणारा स्पर्श..त्याचे त्यासी भानच नव्हते.. आपल्या मंतरलेल्या लेखणीतून तो कवितांचे सुंदर आविष्कार रचित होता. रानामधून तो नुकताच बाहेर पडलाय, पण मागे मात्र असंख्य रहस्ये तशीच ठेवून गेला. आता उकल करावयाची ती त्याच्या कवितेच्या प्रत्येक अलौकिक शब्दांमधून.. आणि त्याला आठवित राहावयाचे, गर्द रानामधुनी हिंडत...
पानांचा स्पर्श अनुभवत...
कवी ग्रेस यांस भावपूर्ण श्रद्धांजली.

**प्रसाद पिंपळकर**

देव्हारा रिता रिता का
देवास उमगले नाही
तू जाता "ग्रेस" आम्हातून
अश्रू शब्दांचे लपले नाही.

**दिपक साळुंखे - पुणे**

काळाच्या प्रतिमा दिसत आहेत
पण काळ अदृश्य भासतो आहे
पण त्याला एक ना एक दिवस गाठणार आहे
त्यासाठी गर्भात जाव लागल तरी चालेल
नचिकेतासारखा उलटा प्रवास देखील करेन
पण विचारायच आहे
जन्माचे मरणाशी नाते काय ?
माझ्या मरणावर विजय नको मला
पण माझ्या जवळच्या लोकांचे मरण मी पाहू शकत नाही
कारण त्यानंतरही मला जगाव लागणार आहे
मरणवाटांवर पडलेले
काळाच्या प्रतिमांचे तुकडे उचलण्यासाठी
पण त्या प्रतिमांशिवाय

**कविता मोकाशी**

## grace

कातरवेळ कातरलेली
अर्थांचे व्याकुळ पाणी
शब्दांच्या देहामधली
उरली फक्त निशाणी

त्या मंथर आर्ततेची
बाग जरा झांजरली
प्रस्थानाची गाणी
डोळ्यातून पाझरली

कवितेची गाव रिकामे
यमुनेचा काठ ही रडतो
ताल, चाल, लईन्चा
रथ कायमचा अडतो

देहातून वाजत आहे
कवितेची धून अनावर
क्षितिजावर चमकत राहे
ग्रेस एक अजरामर :

**बापू दासरी - नांदेड**






**So called tragedies are always movable because I understand all those designs of manners and cultural mannerism but I fail to note that sharp agony of all unfinished sentences..........**

**They never**

# कवी ग्रेस यांच्या ४ कविता

## “चंद्रमाधवीचे प्रदेश” या काव्यसंग्रहातील

### मर्म

ज्याचे त्याने घ्यावे
ओंजळीत पाणी
कुणासाठी कोणी
        थांबू नये!
...असे उणे नभ
ज्यात तुझा धर्म
माझे मीही मर्म
      स्पर्शू नये

### वाटेपाशी

रात्र थांबवुनी असेच उठावे
तुझ्यापाशी यावे क्षणासाठी!
डोळियांच्या व्हाव्या वेड्या गाठीभेटी
आणि दिठी दिठी शब्द यावे!
तूही थेंब थेंब शब्दापाठी द्यावा
अर्थ ओला व्हावा माझ्यासाठी
आणि उजाडता पाठीवर ओझे
वाटेपाशी तुझे डोळे यावे!

### एक

एक हात तुझा एक हात माझा
जसा शब्द खुजा शब्दापाशी
एका हृदयाला एकच क्षितिज
आकाशाचे बीज तुझ्या पोटी
एका कुशीसाठी एकाचे निजणे
बाकीची सरणे स्मशानात

### वाटा

माझ्या मनापाशी
चैतन्याचा क्षण
निळी आठवण
बाभळीचे डोळे
डोळ्यांतला काटा
माझा मला वाटा



# मरण

अलभ्य फुलला सखे घनवसंत हा मोगरा
विनम्र लपवू कुठे हृदयस्पंदनाचा झरा

उन्हात मन शिंपिले पळसपेटला पारवा
कुडीत जळतो जसा मरणचंदणाचा दिवा

कुशीत जड अस्थिला नितळ पालवीची स्पृहा
भयाण मज वाटतो रुधिर अस्त गांधार हा

उदास भयस्वप्न की समिर येथला कोवळा
गळ्यात मग माझिया सहज घातला तू गळा

सुगंध दडवू कुठे गगन वैरिणीचे वरी
तुडुंब भरले तुवा कलश अमृताचे घरी

जळात जरी नागवी सलग इंद्रियांची दिठी
विभक्त जणु कुंतिला शरण कर्ण ये शेवटी

**ग्रेस**



घर थकलेले संन्यासी : हळू हळू भिंतही खचते
आईच्या डोळ्यांमधले नक्षत्र मला भासवते

ती नव्हती संध्या मधुरा, रखरखते ऊनच होते
धग ओढुनी संधेवानी आभाळ पसरले होते

पक्षांची घरटी होती : ते झाड तोडले कोणी
एक एक ओंजळी मागे असतेच झर्यांचे पाणी

मी भिऊन अंधाराला, अडगळीत लपूनी जाई
ये हलके हलके मागे त्या दरीतली वनराई







# ज्येष्ठ कवी ग्रेस तथा माणिक गोडघाटे सरांच्या सहवासातील काही संस्मरणीय क्षण : उपेंद्र चिंचोरे



मा. कवी ग्रेस, ह्यांची नि माझी पहिली समक्ष भेट झाली, तो दिवस होता, १२ ऑगस्ट २००३ ! पुण्यातील प्रभात रोडवरील स्वरूप हॉटेलमध्ये !

"दुपारी साडेतीन वाजता ग्रेस सरांना भेटा", असा मला मुंबईहून मा. मंगेशकर ह्यांच्या घरून फोन आला ! त्या भेटीचे निमित्त म्हणजे, मा. पंडित हृदयनाथजी मंगेशकर ह्यांना कोल्हापूर येथे करवीरपीठाच्या शंकराचार्यांच्या शुभहस्ते "भावगंधर्व" ही पदवी बहाल करावयाचा समारंभ होणार होता. त्या सोहळ्यानिमित्त प्रकाशित होणा-या गौरवग्रंथाकरिता कवी ग्रेस सर लेख देणार होते .

आमच्या प्रथम समक्ष भेटीमध्येच मनमोकळ्या सुसंवादाचे रुपांतर, आपुलकीच्या स्नेहात झाले. अन् ते अखेरच्या क्षणापर्यंत तसेच अबाधित राहिले ! ते मला म्हणाले, "दरवर्षी आपण माझ्या वाढदिवसाला, न चुकता शुभेच्छापत्र पाठविता, त्याचे मला अप्रूप वाटते. आज आपली या निमित्ताने समक्ष भेट होत आहे"!

"भयाण गारव्यातही, तुझ्या घरात ये सती / चंद्रीकाच मागते, शिवालयात सद्‌गती", हे शीर्षक असलेला ग्रेस सरांचा अभ्यासपूर्ण लेख त्यांनी माझ्याकडे सुपूर्त केला. "हृदयांतरी " हे शीर्षक असलेल्या गौरवग्रंथामध्ये सदर लेख प्रसिद्ध झाला होता. पुढे, पंडित हृदयनाथजी मंगेशकर ह्यांच्या विविध कार्यक्रमांच्या वेळी ग्रेस सरांची वरचेवर भेट होऊ लागली. ग्रेस सरांचा चाहता वर्गही आवर्जून अश्या कार्यक्रमांना उपस्थित रहात आलाय.

"ती गेली तेव्हां पाउस निनादात होता, भय इथले संपत नाही" ही लोकप्रिय गाणी सादर झाल्याशिवाय कार्यक्रमाची पूर्तता व्हायची नाही. आणि एके दिवशी, ग्रेस सरांना दुर्धर व्याधीने ग्रासल्याची अशुभ वार्ता कानावर आली. विश्वास बसत नव्हता, पण सत्य समोरच उभे ठाकले होते. पंडित हृदयनाथजी आणि ग्रेस सरांचा लोभ सर्वश्रुत आहेच ! पुण्याच्या मास्टर दीनानाथ मंगेशकर रुग्णालयात" ग्रेस सर दाखल झाले. त्या व्याधीग्रस्त अवस्थेमध्येही ग्रेस सर, दूरदूरहून आलेल्या चाहत्यांना आवर्जून भेटायचे. विविध कार्यक्रमांमध्ये रमायचे, सहभागी व्हायचे. गेली सात महिने मी हे जवळून बघत होतो. जवळ जवळ रोज, मी दवाखान्यात जात होतो. त्यांच्याशी वार्तालाप होत असे.

भारतीय वायुसेनेच्या इतिहासातील पहिले काव्य मी लिहिले होते. ते ध्वनिमुद्रित गाणे, भारत देशाला अर्पण करण्याचा सोहळा पुण्याच्या लोहोगाव विमान तळावरील वायुसेनेच्या कार्यालयात संपन्न झाला होता. एअर चिफ मार्शल प्रदीप व्ही. नाईक सरांनी त्याचा गौरव केला, त्याची बातमी दुसरे दिवशी सर्व वृत्तपत्रामध्ये प्रसिद्ध झाली. मी रोजच्या सारखा संध्याकाळी दवाखान्यात गेलो, तर, उमद्या मनाच्या ग्रेस सरांनी,माझ्याशी हस्तांदोलन करून अभिनंदन केले होते.

ग्रेस

अश्याच एका संध्याकाळी, पुण्यामध्ये मुसळधार पाउस, सुरु झाला. तो दिवस होता, १५ ऑक्टोबर २०११ ! ग्रेस सर मला म्हणाले, "चिंचोरे सर, माझे काम करणार कां ?" मी म्हणालो, "सर असे काय विचारता, सांगाना, काय हवय"? ग्रेस सर म्हणाले, "बाहेर विजांचा गडगडाट सुरु आहे, धुव्वाधार पडणारा तो पाउस मला पहायचा आहे. लिफ्ट जवळील कॉरीडॉर मध्ये मला घेऊन चलता कां ?" मी तेथील रुग्णसेविकांची अनुमती घेतली. झाले, ग्रेस सरांनी आधी माझा हात धरला, नंतर माझ्या खांद्यावर हात टाकून, व्ह-यांड्यामध्ये हळू हळू चालत आले. कोसळणारा पाउस पाहून ग्रेस सर भान हरखून गेले. पावसावर बोलले. बराच वेळ गेला, अन् मग म्हणाले, "चला आता रुममध्ये परत जाऊ", ग्रेस सरांच्या स्नेहाने चिंब भिजलेले अनेक क्षण मला अनुभवायाला मिळाले.

एके दिवशी संध्याकाळी मी त्यांना भेटायला जाताच, ग्रेस सर म्हणाले, "अहो, पंडितजींच्यावर मी लिहिलेला तो लेख मला द्याल कां, उद्या दुपारी एक प्रकाशक येणार आहेत. त्यांना तो लेख द्यायचा आहे." मी म्हणालो, "सर आत्ता अर्ध्यातासात घरी जाऊन तो लेख घेऊन येतो", तसे सर म्हणाले, "अहो, आत्ता पुन्हा हेलपाटा नका घेऊ, उद्या आणा". दुस-या दिवशी, मी दवाखान्यात जाताच, सरांच्या हाती, त्या लेखाची झेरॉक्स प्रत दिली. त्यांना केवढा आनंद झाला. समोरच बसलेल्या प्रकाशकांना त्यांनी तो लेख सुपूर्द केला. अन माझ्याविषयी, त्यांना काही सांगितले.

मास्टर दीनानाथांच्या जयंतीनिमित्त, मास्टर दीनानाथ मंगेशकर रुग्णालयाच्या "दीनायन कलापर्व"ने ती.सौ. मीनाताई मंगेशकर-खडीकर, ह्यांचा ७ जानेवारी २०१२ रोजी "दशांगुळे उरला" हा कार्यक्रम आयोजित केला होता. दुपारपासूनच ग्रेस सरांनी मला सांगून ठेवले होते, "मला तुम्ही प्रेक्षागृहात घेऊन चला. मला हा कार्यक्रम समोरून अनुभावायाचा आहे." वास्तविक, सरांच्या रुममध्ये असलेल्या टी.व्ही.वरून त्यांना कार्यक्रम बघता आला असता. पण त्यांनी हट्टच धरला. अखेरीस, माझ्या खांद्यावर हात ठेवून सर प्रेक्शागृहामध्ये आले. आम्ही अगदी पुढच्या रांगेमध्ये शेजारी-शेजारी बसलो. मीनाताई ह्यांच्या वक्तव्याला दाद देत त्यांनी कार्यक्रम पाहिला. "ओल्या वेळूची बासरी" ह्या ग्रेस सरांच्या ललितबंध संग्रहाचे प्रकाशन, मंगळवार, दिनांक १० जानेवारी २०१२ रोजी, झाले. हा प्रकाशन सोहळा, दीनायन कलामंच आणि पॉपुलर प्रकाशन ने, आयोजित केला होता. ग्रेस सरांच्याच पुस्तकाचे प्रकाशन होत असतांना, सरांनी मंचावर बसण्यास नकार दिला."प्रेक्षकांमध्येच बसून मी तो कार्यक्रम बघणार", असे त्यांनी आवर्जून सांगितले. पंडित हृदयनाथ ह्यांच्या हस्ते प्रकाशन झाले. डॉक्टर धनंजय केळकर, ह्यांनी त्यांचे मनोगत व्यक्त केले. पॉपुलरचे प्रकाशक रामदास भटकळ, ह्यांची चित्र फीत दाखविण्यात आली.

ग्रेस सरांना नामांकित असे कितीतरी विविध पुरस्कार लाभले, पण सर होते, तसेच राहिले. निगर्वी, निर्मळ ! काल २५ मार्च रोजी संध्याकाळी, मी पुन्हा दवाखान्यात गेलो होतो, जीव उडून गेला, सा-या रात्रभर डोळ्याला डोळा नव्हता. आज ग्रेस सरांना देवाज्ञा झाली, अन मन सैर-भैर झाले. प्रदीर्घ आठवणीचा पट डोळ्यासमोर फेर धरू लागलाय. त्यांच्याच लेखणीतून प्रकटलेले वास्तव मनाला सांगत सुटले, "भय इथले संपत नाही, मज तुझी आठवण येते" !

उपेंद्र चिंचोरे - chinchoreupendra@yahoo.com

# ते शुभ्र निरांजन ढळले.....



जाण्याच्या वेळेचे मंतरलेले दिवस, परतीची संध्यामयूर वाट, पिसारा प्राणपणाने जपतात लोक अन  झडलेल्या पिसा-यातंतून सजत जातो आपल्याच पावलांचा धाक. ते दूर असतील, इथून बर्फालाही, हृदयालाही मिळत नाही राख, देवी! या झोळीतली भिक्षा याच झोळीत टाक...

अशी आर्त पण प्रामाणिक हाक घालणारा तो कवी, देवीच्या,देवालयाच्या वाटेवर पावले टाकू लागतो तेव्हा त्या प्रत्येक पावलागत मागे पडत जाणा-या विस्मितांना जाणवतात ते केवळ नादमयी शहारे..प्रत्येक शहा-यातले अनामिक भय आणि अखंड जपलेल्या प्राचीनतेची चिन्हे. हे आभाळ वेडे ढग जेव्हा गाढ धुक्याच्या पदरात अदृश्य होऊ लागतात तेव्हा वास्तवाची आणि अकल्पिताची जाणीवच नाहीशी होऊ लागते अन मागे उरतात ते केवळ कोरले गेलेले क्षण आणि त्या क्षणांची खोल्वर रुतत जाणारी स्पर्शासन्न आस्था. गूढतेच्या नात्यांची आणि अबोधतेच्या गाण्यातंली ओढ का हळवी करते मग आपसुक पणे? कुठल्या गायीचे चित्र जेव्हा आईच्या भावनेने समोर येते तेव्हा डोळे भरून येतातच ना? असच असतं या दूरच्या प्रवासाच्या वाटांच..कधीही, केव्हाही, न बोलावता, हात धरून घेऊन जातील याचा नेम नाही. हा प्राचीन युगाचा स्वामी आजीवन जपत आला असेल तर त्याची तत्व या तत्वांची वीण आणि कृतज्ञतेचे भार. ग्रेसफुल आयुष्य जगताना जीवाच्या पार जपल्या गेली असेल तर ग्रेस मधली जाणीव.काल्पनिक सत्यांच्या तळागाळाला छेदू पाहणारा हा कवी अकल्पित अलौकिक सौंदर्याची वाट शोधता शोधता आकस्मित पणे दु:खद किना-यावर येऊन ठेपतो आणि आत्मशोधाच्या आजीवन प्रयासाने पुढच्या प्रवासाच्या वाटावंर चालू लागतो त्यावेळी कदाचित आधीच लिहुन ठेवलेल्या, मनन केलेल्या, समजुन घेतलेल्या या वैचारिकतेची पातळी आणि खोली यांची व्याप्ती जाणवते. दुर्बोधतेचा हा कवी अजाणतेची शाल कधिच पांघरत नाही, तर किंबहुना मायेच्या पडवीतही संध्यासमईची घालमेल त्यांना गळाभेट देत असताना ते म्हणतात- "संध्यामाईच्या पणतीची तडतड मला ईथेही जाणवत आहे. पणतीच्या खापराने पणतीतील सगळे तेल तर शोषून घेतले नसेल ना? कुणाला विचारावे? अंजनीसुताच्या परतीचा संजीवनी सुगावा अजून माझ्या दृष्टीपथातच येत नाही" साक्षात्कार हा एका क्षणाचा असतो आणि साक्षातकाराचा मोलाचा एकच क्षण आयुष्याचा अंतिम वेळी आला तरीही तितकाच पावन! मात्र साक्षात्कारांच्या शोधात रानोमाळ न फ़िरता केवळ एका क्षणातून नव्या कडीचा शोध घेताना पुढे "पडवीचे काय?" हा प्रश्न ज्याला पडतो त्याच्या मर्मपूर्ण हृदयाची एखादी लकेर तरी आम्ही ओढू शकतो का?

WE WALK WITH LOWERED EYELIDS THERE AND SILENT GO-BEHIND THE BLINDS?

या पडवीच्या सत्यातून कडी कडीचा शोध घेताना हा कवी कोणत्या असिम निद्रेच्या संमोहिनीला कवटाळत तर नसेल?आपल्या अर्पणपत्रिकांच्या समर्पणात त्याच संमोहिनीचे ऋण म्हणून त्याची वैष्णवी कधी त्या पिंडाला शिवणा-या कावळ्याला अर्पण होते तर कधी भाकरतुकडा ओवाळून टाकणा-या पडवीला तर कधी अंगणात दाणे टाकण्यापूर्विच उडुन जाणा-या चिमण्यांना! पात्र असोत किंवा अनुभव, मात्र त्यांच्या होणा-या परिणामांना आत्मसात करून घेतल्यानंतरच्या कव्यान्वयाच्या निष्कर्शातून होणारी अनुभुती ही या निर्मितीप्रक्रियेची नीव नसेल काय? आणि हीच सृजनशीलतेची किमया त्या किना-यावरील लांबच्या प्रवासातली  एखादी अजून नवी कडीच असेल तर?



तुला येईल का या बर्फ़ाची करूणा? ईश्वरासारखे उदास माझे प्रेम मृत्यू सारखी नितळ माझी कविता पुढेही असेच का? हा प्रश्न टाकणारा हा कवी, हा दुर्बोध कवी, नकळत अनेक जाणीवांचा उजाळा करतो त्यावेळी अनेक संकल्पनांची सत्ये मिथ्ये हातात हात घालुन उभी रहिल्यासारखी जाणवतात. थरकाप करणा-या संवेदनांना कुरवाळून, गोंजारुन जोजवऊन झोपी घालण्याचं सामर्थ्य मोठं म्हणायचं की ह्या संवेदनांची तीव्र अणकुचिदार बोच सुईच्या टोकाच्या क्षण क्षण परंतू सातत्याने होत असणा-या वेदनांना त्यांची भुक शमेपर्यंत त्यांचं पालन पोषण करण्याचं सामर्थ्य मोठं म्हणायचं हेच समजत नाही. संधीकालच्या निशब्द तल्लीनतेत रुजताना कोण्त्या आर्जवी स्वरात आळवत असेल हा त्याच्या त्या करुणार्त ईश्वराला? अपर्थिव आणि पार्थीवतेच्या मधली सामन्यांची होणारी ही परवड याची कधी झालीच नसेल? दु:खाची परिसीमा म्हणजेच मृत्यु, आयुष्याच्या रंगांची वलय मिटवून टाकणारा म्हणजेच मृत्यू मात्र याच छत्रछायेखाली फुलते ते जीवन असा वेडा ध्यास असणारा कवी आज त्या अनंत सुखदु:खाच्या कोड्यातून मोकळा झाला खरा मात्र जाता जाता मृत्यू सख्याला कुरवाळून जातो तो असा..असे वाटते मृत्यू असतो सखा रे सतीच्या खूनासारखा पोरका....

कावळ्याला पक्षीयांचा राणा म्हणणारा हा कवी मृत्युला सरावाची जहागीर जरी मानत नसला तरी जीवनाचा सराव आणि सरावाने वाटणारे मृत्यू चे भय याची सांगड घालताना दिसतो. या भयाचे आणि जीवनातील साक्षात भयाचे पुल बांधताना त्यांच्यातील भेद मोकळे करून दाखवतो आणि त्यांच्यातिल सौंदर्याच्या तरलतेच्या अनुभवाची तुलना त्या श्याम काळ्या कावळ्यांच्या मानेवरील निळ्या जांभल्या चमचमत्या रेखांशी करून मृत्यूच्या भयाचे आणि जीवनाच्या संभवाचे दोन्ही घट्क एकाच धाग्यात बांधून त्याच मृत्यूच्या प्रवासाला विमुक्त पणे निघून जातो तेव्हा तुम्हा आम्हांकडे असहायतेच्या नजरेने दाटून येणारे काळमेघ तोलून धरण्यापलिकडे काहीच उरत नाही...हा असा अंतिम दृष्टांत ज्यात एकाचवेळी, एकाच शक्तीने, एकाच तन्मयतेने, निशब्दतेने भावनांना वाहून नेणारा, मागे काहिही न शिल्लक ठेवणारा दृष्टांत आनंदमयी होवो हीच ईश्वरचरणी प्रार्थना..

**सौ. सुरुची नाईक – नागपुर**

## नाही कुणी रे आपले
## प्राणांवर नभ धरणारे
## दिक्काल धुक्याच्या वेळी
## ह्दयाला स्पंदविणारे

भय इथले संपत नाही...मज तुझी आठवण येते...
मी संध्याकाळी गातो...तू मला शिकविली गीते...

हे झरे चंद्र सजणांचे, ही धरती भगवी माया
झाडांशी निजलो आपण, झाडांत पुन्हा उगवाया

त्या वेळी नाजूक भोळ्या, वाऱ्याला हसवून पळती
क्षितीजांचे तोरण घेऊन, दारावर आली भरती

तो बोल मंद हळवासा आयुष्य स्पर्शुनी गेला
सीतेच्या वनवासातील जणू राघव शेला

देऊळ पलिकडे तरीही, तुज ओंजळ फुटला खांब
थरथरत्या बुबूळापाशी, मी उरला सुरला थेंब

संध्येतील कमल फ़ुलासम, मी नटलो श्रृंगाराने
देहाच्या भवती रिंगण, घालती निळाईत राने

स्त्रोत्रात इंद्रिये अवघी, गुणगुणती दुःख्ख कुणाचे
हे सरता संपत नाही, चांदणे तुझ्या स्मरणाचे

ते धुके अवेळी होते, की परतायची घाई
मेंदुतून ढळली माझ्या, निष्पर्ण तरुंची राई



मी खरंच पुढे निघालो,
तू येऊ नको ना मागे....
पाऊस दूरवर वाजे
हृदयाचे तुटती धागे...

# ती गेली तेव्हा रिमझिम

ती गेली तेव्हा रिमझिम, पाऊस निनादत होता
मेघांत अडकली किरणे, हा सूर्य सोडवित होता
तशि सांजहि अमुच्या दारी, येऊन थबकली होती
शब्दांत अर्थ उगवावा, अर्थांतुन शब्द वगळता
ती आई होती म्हणुनी, घनव्याकुळ मीही रडलो
त्यावेळी वारा सावध, पाचोळा उडवित होता
अंगणात गमले मजला, संपले बालपण माझे
खिडकीवर धुरकट तेव्हा, कंदील एकटा होता
हे रक्त वाढतानाही, मज आता गहिंवर नाही
वस्त्रांत द्रौपदीच्याही, तो कृष्ण नागडा होता



निर्मिती अक्षरी

''डोंगरावरी कल्लोळ अलीकडे सर्व निवांत..
नीजतात कसे हे लोक सरणाच्या खाली शांत."

## कवी ग्रेस

१० मे १९३७ – २६ मार्च २०१२



कवी ग्रेस यांना नेटाक्षरीची हि भावपुर्ण आदरांजली.....